**दि.१३/७/११ रोजी मुंबई येथील बॉम्बस्फोटात मृत झालेल्या व्यक्तींच्या वारसांना मदत देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आरएलएफ-२०१४/प्र.क्र.११०/म-३

मंत्रालय,मुंबई-४०००३२.
दिनांक : २९ऑक्टोबर, २०१४

**वाचा :-** १) केंद्र शासनाचे पत्र क्र.११०४४/११/२०११ व्हीटीव्ही, दि.२९ जून, २०१२
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.एनएएक्स १२१२/प्र.क्र.५०१/विशा-१ ब, दि २१.एप्रिल २०१४ ,
३) जिल्हाधिकारी, ठाणे यांचे पत्र क्र. सामान्य/क-४/टे-८/बॉम्बस्फोट/ दि.१३ जुलै २०११, दि. १६.९. २०१४
४) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. आरएलएफ-२०१४/प्र.क्र.११०/म-३ दिनांक १६.९.२०१४
५) मा. उच्च न्यायालय मुंबई यांनी जनहीत याचिका क्र. ६६/२०१४ संदर्भात दि. १४.१०.२०१४ रोजी दिलेले आदेश.
६) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. पुनर्वि २०१४/२२३५/ प्र.क्र. १४६/ ब-१, दि.२९/१०/२०१४

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन दि. २९.६.२०१२ च्या सुधारीत केंद्रीय योजनेंतर्गत दि.१३ जुलै, २०११ रोजी मुंबई शहरात झालेल्या बॉम्बस्फोटात मृत पावलेल्या व्यक्तींच्या वारसांना आणि कायम अपंगत्व आलेल्या व्यक्तींना प्रत्येकी रु.३.०० लाख इतकी मदत अनुज्ञेय आहे.

दिनांक १३.७.२०११ रोजी मुंबई शहरात झालेल्या बॉम्बस्फोटात मृत पावलेल्या ठाणे जिल्ह्यातील ४ मृत व्यक्तींच्या वारसांना केंद्र शासनाच्या वरील धोरणानुसार प्रत्येकी रू. ३.०० लक्ष इतकी मदत देण्याचा निर्णय संदर्भाधीन दि. १६.९.२०१४ अन्वये घेण्यात आला आहे. त्यानुसार सदर रक्कम दिनांक १६.९.२०१४ रोजी संबंधितांना अदा करण्यात आली आहे. सदर आपदग्रस्तांच्या कुटुंबियांना दिनांक २३.९.२०१३ते दि. १७.९.२०१४ इतक्या कालावधीसाठी वरील रकमेवर १८ टक्के दराने व्याज देण्याबाबत मा. उच्च न्यायलयाने दि. १४.१०.२०१४ रोजी आदेशित केले आहे.

त्याचप्रमाणे दि. १३.७.२०११ रोजी मुंबई शहरात बॉम्बस्फोटात मृत झालेल्या मुंबई जिल्ह्यातील बाधितांना मदत देण्याबाबत मा. उच्च न्यायालयाने आदेशित केले आहे. जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांनी त्यांचे जिल्ह्यात ४ मृत व्यक्तींच्या वारसांना व १ कायम अपंगत्व आलेल्या व्यक्तीला प्रत्येकी रू. ३.०० लक्ष देणे आवश्यक असल्याची मागणी केली आहे.

**शासन निर्णय :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या ३ दि. १४.१०.२०१४ च्या आदेशानव्ये, दि.१३ जुलै, २०११ रोजी मुंबई शहरात झालेल्या बॉम्बस्फोटात मृत पावलेल्या ठाणे जिल्ह्यातील४ व्यक्तींच्या वारसांना विलंबाने प्रदान केलेल्या रकमेवर व्याज देणे तसेच मुंबई जिल्ह्यातील ४ मृत व्यक्ती व १ कायम अपंगत्व आलेल्या व्यक्तीला मदत देण्यासाठी रू. २०.०० लक्ष इतका निधी पुनर्विनियोजनाने उपलब्ध करून देण्यास शासनाने मान्यता दिली आहे.

२. उपरोक्त निधीपैकी जिल्हाधिकारी, ठाणे यांचेकडे रू. २,१६,०००/- (रूपये दोन लक्ष सोळा हजार फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, ठाणे यांच्याकडे उपलब्ध करून देण्यात येत आहे.मा. उच्च न्यायालयाच्या दि. १४.१०.२०१४ च्या आदेशानुसार अनुज्ञेय असलेली रक्कम जिल्हाधिकारी, ठाणे यांनी मृत व्यक्तींच्या वारसांना तात्काळ अदा करावी.

३. त्याचप्रमाणे उपरोक्त निधीपैकी जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचेकडे रू. १७,८४,०००/- (रूपये सतरा लक्ष चौ-याऐंशी हजार फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी,मुंबई शहर यांच्याकडे उपलब्ध करून देण्यात येत आहे. मा. उच्च न्यायालयाच्या दि. १४.१०.२०१४ च्या आदेशानुसार अनुज्ञेय असलेली रक्कम जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांनी मृत व्यक्तींच्या वारसांना तात्काळ अदा करावी.

४. जिल्हाधिकारी, ठाणेव जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांना सुपूर्द करावयाचा निधी संदर्भाधीन दि. २९ ऑक्टोंबर, २०१४ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध केल्यानुसार खालील लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक : सी-५
२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण
६० इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम
२००- इतर कार्यक्रम
२०० (०१) (०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य
(२२३५ ०३४७) (दत्तमत)
३१-सहाय्यक अनुदाने

५. सदर निधी अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) वर जिल्हाधिकारी, ठाणे व जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचेकडे सुपूर्द करण्यात येत आहे. सदर निधीचे वितरण केंद्र शासनाच्या सूचनांनुसार संबंधित बाधितांच्या वारसांना करण्यात यावी. सदर निधीचे वितरण तातडीने करण्यात येऊन करण्यात आलेल्या कार्यवाहीची माहिती सचिव, मदत व पुनर्वसन यांचेकडे सादर करावी.

६. तसेच केंद्र शासनाकडून सदर रकमेची प्रतिपूर्ती करण्याची कार्यवाही संबंधित जिल्हाधिकारी यांनी तात्काळ करावी.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक५७४/२०१४/व्यय-९, दि.२८/१०/२०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०३०१२२००३६३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Rajaram Jagtap

Digitally signed by Ashok Rajaram Jagtap
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Rajaram Jagtap
Date: 2014.10.30 16:31:53 +05'30'

( अ.रा.जगताप )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, मुंबई
२) जिल्हाधिकारी,ठाणे
३) जिल्हाधिकारी, मुंबई शहर
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५) जिल्हा कोषागार अधिकारी,ठाणे
६) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर
७) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर
८) वित्त विभाग (अर्थसंकल्प शाखा-४/व्यय-९),मंत्रालय,मुंबई
९) कक्ष अधिकारी,ब-१/पीएसी/पीएसी-१कार्यासने,म.व व.वि.,मंत्रालय,मुंबई-३२
१०) निवडनस्ती (म-३कार्यासन) महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई ३२

*******